**पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार**

***अधिसूचना***

नवी दिल्ली, दिनांक १४ फेब्रुवारी, २०००.

**एस.ओ. १२३ (इ).-** ज्याअर्थी, सार्वजनिक ठिकाणी वातावरणात दिवसेंदिवस ध्वनीची तीव्रता विविध स्त्रोतांमुळे वाढतच आहे, तसेच औद्योगिक कामे, विविध प्रकारची बांधकामे, जनित्रे (जनरेटर्स), ध्वनिवर्धक (लाऊड स्पीकर्स), सार्वजनिक सभा, संगीत वाद्ये, वाहनांचे भोंगे व इतर यांत्रिक साधनांमुळे वातावरणातील ध्वनीचे प्रमाण वाढतच आहे. वाढत्या ध्वनी प्रदूषणामुळे नागरिकांच्या आरोग्यावर व मानसिक स्वास्थ्यावर अनिष्ट परिणाम होत असल्यामुळे वातावरणील ध्वनीची योग्य पातळी राखण्याच्या हेतूने ध्वनी उत्पन्न करणाऱ्या व निर्माण करणाऱ्या स्त्रोतांचे नियमन व नियंत्रण करणे आवश्यक आहे असे वाटते;

ज्याअर्थी, भारत सरकारच्या पर्यावरण व वन मंत्रालयाची अधिसूचना क्र. एस.ओ. ५२८ (इ), दिनांक २८ जून, १९९९ अन्वये ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन) नियम, १९९९ यांचा मसुदा प्रसिध्द करुन त्याद्वारे परिणाम होण्याचा संभव असलेल्या सर्व व्यक्तींकडून, उक्त अधिसूचना अंतर्भूत असलेल्या राजपत्राच्या प्रती जनतेला ज्या तारखेस उपलब्ध होतील त्या तारखेपासून साठ दिवसांचा कालावधी संपण्यापूर्वी, हरकती व सूचना मागविण्यांत आल्या होत्या;

आणि ज्या अर्थी, उक्त राजपत्राच्या प्रती दिनांक १ जुलै, १९९९ रोजी जनतेला उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या;

आणि ज्या अर्थी, प्रारुप शासन निर्णयाच्या संदर्भात जनतेकडून प्राप्त सूचना व हरकतींचा केंद्र शासनाने विचार केला होता;

त्याअर्थी, आता, पर्यावरण (संरक्षण) अधिनियम, १९८६ (१९८६ चा २९) याच्या कलम ३ च्या पोटकलम (२)चा खंड (दोन), कलम ६ चे पोट-कलम (१) व पोट-कलम (२) चा खंड (ब) आणि कलम २५ व पर्यावरण (संरक्षण) नियम, १९८६ यांचा नियम ५ यांद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन केंद्र सरकार याद्वारे ध्वनी उत्पन्न व निर्माण करणाऱ्या साधनांचे नियमन व नियंत्रण करणारे पुढील नियम करीत आहे :-

## ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) नियम, २०००

१. संक्षिप्त नांव व प्रारंभ :-

(१) या नियमांना ध्वनी प्रदूषण ( नियमन व नियंत्रण) नियम, २००० असे म्हणावे.

(२) ते शासकीय राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या तारखेपासून अंमलात येतील.

२. व्याख्या :- या नियमांत, संदर्भानुसार दुसरा अर्थ आवश्यक नसेल तर, --

(अ) "अधिनियम" म्हणजे पर्यावरण (संरक्षण) अधिनियम, १९८६ (१९८६ चा २९);

(ब) "क्षेत्र/झोन" म्हणजे या नियमांना जोडलेल्या अनुसूचीत देण्यात आलेल्या चार प्रवर्गापैकी कोणत्याही प्रवर्गात मोडणारी सर्व क्षेत्रे ;

(क) "प्राधिकारी" म्हणजे अंमलात असलेल्या कायद्यानुसार केंद्र सरकारकडून किंवा यथास्थिती, राज्य शासनाकडून प्राधिकृत करण्यात आलेला कोणताही प्राधिकारी किंवा अधिकारी आणि त्यामध्ये जिल्हा

दंडाधिकारी, पोलीस आयुक्त किंवा त्यावेळी अंमलात असलेल्या कोणत्याही विधिअन्वये ध्वनीच्या संबंधात सभोवतालच्या हवेची दर्जात्मक मानके राखण्यासाठी पदनिर्देशित केलेला कोणताही अधिकारी यांचा समावेश होतो;

(ड) कोणत्याही कारखान्याच्या किंवा जागेच्या संबंधात "व्यक्ती" म्हणजे त्या कारखान्याच्या किंवा जागेच्या कारभारावर जिचे नियंत्रण आहे अशी एखादी व्यक्ती किंवा भोगवटादार किवां त्याचा अभिकर्ता;

(इ) एखाद्या संघराज्याच्या संबंधात "राज्य शासन" म्हणजे संविधानाच्या अनुच्छेद २३९ अन्वये नेमलेला त्याचा प्रशासक.

३. निरनिराळया क्षेत्रांसाठी /झोनसाठी सभोवतालच्या हवेच्या दर्जाची ध्वनी प्रदूषणाच्या संबंधातील मानके:-

(१) निरनिराळया क्षेत्रांसाठी / झोनसाठी सभोवतालच्या हवेच्या दर्जाची ध्वनी प्रदूषणाच्या संबंधातील मानके, या नियमांना जोडलेल्या अनुसूचीत विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे असतील.

(२) निरनिराळया क्षेत्रांसाठी ध्वनी (प्रदूषणाच्या) संबंधातील मानके अंमलात आणणच्या प्रयोजनासाठी शासनास क्षेत्रांचे औद्योगिक, वाणिज्यिक, निवासी किंवा शांतता क्षेत्रे/झोन असे वर्गीकरण करता येईल.

(३) वाहनांच्या वर्दळीमुळे (येजा) निर्माण होणाऱ्या ध्वनीसह ध्वनी कमी करण्यासाठी राज्य शासन उपाय योजील आणि या नियमांन्वये विनिर्दिष्ट केलेल्या सभोवतालच्या हवेच्या दर्जाच्या ध्वनी प्रदुषणाच्या मानकांपेक्षा विद्यमान ध्वनीची पातळी अधिक होणार नाही याची खात्री करुन घेईल.

(४) सर्व विकास प्राधिकरणे, स्थानिक मंडळे आणि इतर सबंधित प्राधिकरणे, विकासविषयक कामांचे नियोजन करताना किंवा शहराच्या आणि देशाच्या नियोजनाच्या संबंधातील कामे पार पाडताना, ध्वनी प्रदुषणाचे संकट टाळण्यासाठी आणि सभोवतालच्या हवेच्या दर्जाची ध्वनी प्रदुषणाच्या संबंधातील मानके राखण्याचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी जीवनाच्या दर्जाचे एक मोजमाप म्हणून ध्वनी प्रदुषणाच्या सर्व बाबी विचारात घेतील.

(५) रुग्णालये, शैक्षणिक संस्था आणि न्यायालये यांच्या सभोवतालचे कमीत कमी १०० मीटर क्षेत्र, या नियमांच्या प्रयोजनासाठी शांतता क्षेत्र / झोन म्हणून जाहीर करता येईल.

४. ध्वनी प्रदुषणाच्या नियंत्रणाचे उपाय अंमलात आणण्याच्या संबंधातील जबाबदारी :-

(१) कोणत्याही क्षेत्रातील /झोन मधील ध्वनीची पातळी या अनुसूचीत विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे ध्वनीच्या संबंधातील सभोवतालच्या हवेच्या प्रमाण दर्जापेक्षा अधिक असता कामा नये.

(२) हे प्राधिकरण, ध्वनी प्रदुषणाचे नियंत्रणविषयक उपाय अंमलात आणण्यासाठी आणि ध्वनीच्या सबंधातील सभोवतालच्या हवेच्या दर्जाच्या मानकांचे योग्य अनुपालन करण्यासाठी जबाबदार असेल.

५. ध्वनीक्षेपक /सार्वजनिक सभेच्या ठिकाणची ध्वनीवर्धक यंत्रणा यांच्या वापरावरील निर्बंध :-

(१) या प्राधिकरणाकडून लेखी परवानगी मिळविल्याखेरीज ध्वनिक्षेपकाचा किंवा ध्वनिवर्धक यंत्रणेचा वापर करता येणार नाही.

(२) ध्वनिक्षेपक व ध्वनिवर्धक यंत्रणेचा वापर, श्रोतृगृहे, सभागृहे, सामूहिक सभागृहे आणि मेजवानी कक्ष यासारंख्या बंद जागांखेरीज इतर ठिकाणी (रात्री १० वाजल्यापासून सकाळी ६ वाजेपर्यंत) करता येणार नाही.

६. शांतता झोन/क्षेत्र यांमधील कोणत्याही उल्लंघनाचे परिणाम.

शांतता झोन/क्षेत्र याखाली येणाऱ्या कोणत्याही ठिकाणी जो कोणी पुढीलपैकी कोणताही अपराध करीत तो, या अधिनियमाच्या तरतुदींन्वये शिक्षा होण्यास पात्र असेल -

(एक) जो कोणी गाणे वाजवील किंवा कोणत्याही ध्वनिवर्धकाचा वापर करील,

(दोन) जो कोणी ढोल किंवा टम-टम वाजवील किंवा एकतर संगीत किंवा ताणाचे शिंग फुंकील किंवा तुतारी फुंकील किंवा कोणतेही वाद्य बडवील किंवा वाजवील किंवा

(तीन) जो कोणी गर्दी खेचण्याच्या एखाद्या स्वरुपाचा कोणताही नकलांचा, संगीताचा किंवा इतर कार्यक्रम प्रदर्शित करील.

७. प्राधिकरणाकडे तक्रारी करणे.

(१) आवाजाची पातळी कोणत्याही क्षेत्राच्या/झोनच्या समोरील स्तंभात देण्यात आलेल्या सभोवतालच्या आवाजाच्या मानकापेक्षा १० डेसिबल्स (ए) किंवा अधिक वाढली असेल तर, एखाद्या व्यक्तीला प्राधिकरणाकडे तक्रार करता येईल.

(२) ते प्राधिकरण तक्रारीवर कार्यवाही करील आणि या नियमांच्या आणि अंमलात असलेल्या कोणत्याही इतर विधीच्या तरतुदींनुसार उल्लंघन करणाऱ्यावर कारवाई करील.

८. सतत चालू असलेल्या संगीताच्या आवाजास किंवा गोंगाटास (आवाजास) मना करण्याचा अधिकार-

(१) एखाद्या पोलीस ठाण्याच्या प्रभारी अधिका-याच्या अहवालावरुन किंवा त्याला मिळालेल्या माहितीवरुन त्या प्राधिकाऱ्याची अशी खात्री झाली असेल की, त्रास, अडथळा, गैरसोय किंवा क्षति यांना प्रतिबंध करण्यासाठी किंवा जवळपास राहणाऱ्या किंवा मालमत्तेचा भोगवटा करणाऱ्या जनतेस किंवा व्यक्तीस होणारा त्रास, अडथळा, गैरसोय, क्षति यांचा धोका टाळण्यासाठी तसे करणे आवश्यक आहे तर त्यास लेखी आदेशाद्वारे आवश्यक वाटतील असे निदेश पुढील गोष्टींना प्रतिबंध करण्यासाठी, मना करण्यासाठी, नियंत्रण करण्यासाठी किंवा विनियमन करण्यासाठी देता येतील :-

(अ) कोणत्यही जागेत किंवा जागेवर -

(एक) कोणत्याही (वाचिक) संगीताचा किंवा वाद्याच्या संगीताचा,

(दोन) ध्वनि निर्माण करण्यास किंवा पुनर्निमाण करण्यास सक्षम असेल असा ध्वनिक्षेपक, सार्वजनिक ठिकाणचे ध्वनिवर्धक, उपयंत्र (अप्लायन्स) किंवा उपकरण संच (ॲपरेटस्) किंवा, यंत्रक (कॉन्ट्रिव्हन्स) यांसह कोणतेही वाद्य कोणत्याही रीतीने असो वाजवल्यामुळे, बडवल्यामुळे, परस्परांवर आदळल्यामुळे, फुंकण्यामुळे किंवा वापरल्यामुळे होणरा आवाजाचा आघात किंवा तो चालू राहणे, किंवा

(ब) कोणत्याही जागेत किंवा जागेवर, ज्यामुळे आवाज निर्माण होईल किंवा ज्याचा आवाज निर्माण होतो असा कोणताही व्यापार, व्यवसाय किंवा कामे किंवा प्रक्रिया चालू ठेवणे.

(२) पोट-नियम (१) अन्वये अधिकार प्रदान करण्यात आलेल्या कोणत्याही प्राधिकरणास एकतर स्वतःहून किंवा पोट-नियम (१) अन्वये देण्यात आलेल्या एखाद्या आदेशामुळे व्यथित झालेल्या कोणत्याही व्यक्तीने अर्ज केल्यानंतर असा आदेश रद्द करता येईल, त्यात फेरबदल करता येईल किंवा त्यात फेरफार करता येईल :

परंतु, असा कोणताही अर्ज निकालात काढण्यापूर्वी, उक्त प्राधिकरण अर्जदाराला एकतर व्यक्तीशः किंवा त्याचे प्रतिनिधित्व करणाऱ्या एखाद्या व्यक्तीद्वारे स्वतःपुढे उपस्थित राहण्याची आणि आदेशाविरुध्दचे कारण दाखविण्याची संधी देईल आणि जर ते प्राधिकरण असा कोणताही अर्ज एकतर पूर्णतः किंवा अंशतः फेटाळील तर अशा फेटाळणीची त्याची कारणे नमूद करील.

# अनुसूची

{नियम ३(१) व ४(१) पहा}

सभोवतालच्या हवेच्या दर्जाची ध्वनीच्या (प्रदूषणाच्या) संबंधातील मानके

| क्षेत्राचा प्रवर्ग | क्षेत्राची / झोनची वर्गवारी | डेसिबल्स (ए) एलइक्यू मधील मर्यादा @ | |
|---|---|---|---|
| | | दिवसा | रात्रौ |
| (अ) | औद्योगिक क्षेत्र | ७५ | ७० |
| (ब) | वाणिज्यिक क्षेत्र | ६५ | ५५ |
| (क) | निवासी क्षेत्र | ५५ | ४५ |
| (ड) | शांतता प्रभाग | ५० | ४० |

टिपः-

१. दिवसा म्हणजे सकाळी ६.०० वाजल्यापासून रात्री १०.०० वाजेपर्यंत.

२. रात्री म्हणजे रात्री १०.०० वाजल्यापासून सकाळी ६.०० वाजेपर्यंत.

३. शांतता झोन याचा अर्थ रुग्णालये, शैक्षणिक संस्था आणि न्यायालये यांच्या सभोवतालचे कमीत कमी १०० मीटरपर्यंतचे क्षेत्र. शांतता झोन्स ही अशी झोन्स म्हणून सक्षम प्राधिकरणाने जाहीर केलेली झोन्स आहेत.

४. क्षेत्रांचे मिश्र प्रवर्ग हे सक्षम प्राधिकरणाकडून वर नमूद केलेल्या चार प्रवर्गापैकी एक म्हणून जाहीर करता येतील.

@ डेसिबल्स (ए) एलइक्यु हे प्रमाण ए वरुन डेसिबल्स मधील आवाजाच्या पातळीची वेळेच्या मोजमापानुसार सरासरी दर्शविते व ते मानवाच्या ऐकण्याच्या क्षमतेशी संबंधित आहे.
"डेसिबल" हे आवाज मोजण्याचे युनिट आहे.
डेसिबल्स (ए) एलइक्यू मध्ये "ए" हे आवाजाच्या संदर्भातील वारंवारता मोजण्याचे प्रमाण दर्शविते आणि ते मानवी कानाच्या ऐकण्याच्या क्षमतेशी संबंधित आहे.

एइक्यू : हे एखाद्या विनिर्दिष्ट कालावधीसाठी आवाजाच्या पातळीचे ऊर्जेची सरासरी आहे.

(एफ्.नंबर क्यू. - १४०१२/१/९६- सीपीए)
विजय शर्मा, सहसचिव.

GR-20020412162353000-2200